कुटुंब कल्याण कार्यक्रमाच्या अंमलबजावणी करीता निर्माण केलेल्या ३७ अस्थायी पदांना सन २०१७-१८ या आर्थिक वर्षात दि. ०१.०३.२०१७ ते दि. ३०.०९.२०१७ या कालावधीकरीता मुदत वाढ देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः अस्थायी २०१७ /२७१/प्र. क्र.१०५/ कु.क.

१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २३ मार्च, २०१७

वाचा -

१) सार्वजनिक आरोग्य विभाग शासन निर्णय क्रमांकः अस्थायी- २०१६ /८०५९/प्र. क्र. ७९७/ कु.क..
२) सहसंचालक आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे क्र. संआसे/ आस्था / टे-३/ कक्ष-५ / ३७ अपदे/८१२-१३/२०१७, दि. १० फ़ेब्रुवारी २०१७ चे पत्र
३) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांकः पदनि- २०१६/प्र.क्र.८/ १६ /आ.पु.क. दि. १० फ़ेब्रुवारी, २०१७

प्रस्तावना -

कुटुंब कल्याण कार्यक्रमांच्या अंमलबजावणीकरीता कार्यरत असलेल्या ३७ अस्थायी पदांना संदर्भ क्र. १ अन्वये दि. ०१.१०.२०१६ ते दि. २८.०२.२०१७.पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सन २०१७-१८ या वर्षाकरीता सदर ३७ अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०१७ ते दि. २८.०२.२०१८ या कालावधीकरीता मुदतवाढ देण्यासंदर्भातचा प्रस्ताव संदर्भ क्र. २ अन्वये शासनास प्राप्त झाला आहे. संदर्भ क्र. ३ अन्वये वित्त विभागाने प्रशासकीय विभागातील मंजूर अस्थायी पदांना दि. ०१.०३.२०१७ ते दि .३०.०९.२०१७ पर्यंत मुदत वाढ देण्यास मंजूरी दिली आहे. त्यानुषंगाने सदर ५२ अस्थायी पदांस दि. ०१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

कुटुंब कल्याण कार्यक्रमांतर्गत प्रजनन व बाल आरोग्य कार्यक्रमांतर्गत २२११ लेखाशीर्षाखाली कार्यरत असलेल्या पुढील विवरणपत्रात नमूद ३७ अस्थायी पदांस दि.०१.०३.२०१७ ते दि.३०.०९.२०१७ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

**पदांचे विवरणपत्र**

| अ.क्र. | पदनाम | वेतन श्रेणी (ग्रेड पे) (रूपये) | अस्थाई पद संख्या |
|---|---|---|---|
| १ | सह संचालक , आरोग्य सेवा | १५,६००-३९,१०० (७,६००) | १ |
| २ | उप संचालक, आरोग्य सेवा | १५,६००-३९,१०० (७६००) | २ |
| ३ | सांख्यिकी अधिकारी | ९,३००-३४,८०० (४,४००) | १ |
| ४ | लघुलेखक, उच्च श्रेणी | ९,३००-३४,८०० (४,४००) | १ |
| ५ | सहाय्यक अधिक्षक | ९,३००-३४,८०० (४,२००) | ४ |
| ६ | वाहन चालक | ५,२००-२०,२०० (१,९००) | ४ |
| ७ | सहाय्यक जिल्हा आरोग्य अधिकारी, कुटुंब कल्याण माताबाल संगोपन आणि शालेय आरोग्य (वैद्यकीय ) (वर्ग- १) | १५,६००-३९,१०० (६,६००) | २३ (१७ जिल्हास्तर व ६ राज्य स्तर ) |
| ८ | सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, मुंबई (वर्ग-१) | १५,६००-३९,१०० (६,६००) | १ |
| | **एकूण** | | **३७** |

२. उपरोक्त विवरणपत्रातील नमूद ३७ पदांवरील खर्च पुढील लेखाशीर्षाअंतर्गत भागविण्यात येईल. सदर पदांवरील खर्चाची तरतूद शासनाच्या सन २०१७-१८ च्या मंजूर अर्थसंकल्पिय तरतूदीतून केली जाईल.

**१) अ. क्र. १ ते ६ मधील नमूद पदांकरीता लेखाशीर्ष :-**

मागणी क्र. आर-१, मुख्य लेखाशीर्ष - २२११, ००१ - संचालन व प्रशासन, (०१) राज्य कुटुंबकल्याण केंद्र, १०० % केंद्र पुरस्कृत योजना- (०१) (०२), राज्य कुंटुब कल्याण केंद्र (२२११ ००३१)

**२) अ. क्र. ७ व ८ मधील नमूद पदांकरीता लेखाशीर्ष :-**

मागणी क्र. आर -१ , मुख्य लेखाशीर्ष - २२११ कुटुंब कल्याण, ००१- संचालन व प्रशासन, (०१) कुटुंब कल्याण केंद्र, १०० % केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०३) जिल्हा कुटुंब कल्याण केंद्र (२२११ ००५१)

३. सदर शासन निर्णय, वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२०१३२९०२६४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tulshiram M Shinde

Digitally signed by Tulshiram M Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tulshiram M Shinde
Date: 2017.03.23 12:08:41 +05'30'

**( तु.मु.शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखापरीक्षा / (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर

२. अधिदान व लेखा कोषागार, मुंबई॰
३. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
४. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा, कुटुंब कल्याण, पुणे
५. सह संचालक (अर्थ व प्रशासन ), आरोग्य सेवा, आरोगय सेवा संचालनालय, मुंबई
६. जिल्हा कोषागार अधिकारी , पुणे
७. वित्त विभाग (व्यय-१३/आ.पु.क.) मंत्रालय, मुंबई
८. निवडनस्ती ( कु.क.).